**उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील तालुका एकमेव योजनेंतर्गत आदिवासी प्रगती मंडळ, संचलित, कॉम्रेड गोदावरी शामराव परुळेकर कला, वाणिज्य आणि विज्ञान महाविद्यालय, तलासरी, जि. पालघर या महाविद्यालयांतील शिक्षकीय व शिक्षकेत्तर संवर्गातील पदभरतीबाबत ...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: -HTED-३००१०(१०)/८९/२०२३-MHT-(HE-५)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- १५ मार्च, २०२४

वाचा:-

१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. अनुदा-२०११/(२००/११)पुर्नबांधणी-६/मशि-४, दिनांक २६ मे, २०२२.
२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. पुरक-२०२२/प्र.क्र.५९/(३)मशि-३, दिनांक ०२ जून, २०२३.
३) उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे पत्र क्रमांक उशिसं/२०२३/पदभ/मवि-१/७२१५ दिनांक १९ जुन, २०२३.
४) विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, कोकण विभाग, पनवेल यांचे पत्र क्र.विससं/उशि/कोविप/मशि/ना-हरकत प्रमाणपत्र/२०२४/६५५, दिनांक १२.३.२०२४

प्रस्तावनाः-

राज्यातील सर्व विभागांमध्ये समतोल शैक्षणिक विकास व्हावा असे शासनाचे सर्वसाधारण धोरण आहे. ज्या तालुक्यामध्ये एकही अनुदानित महाविद्यालय नाही अशा १० तालुक्यातील महाविद्यालयांना दिनांक १७ जून, १९९५ च्या शासन निर्णयान्वये अनुदान तत्वावर आणण्यास शासनाने मान्यता दिली. तद्नंतर शैक्षणिक वर्ष २००१-२००२ पासून राज्यात कायम विना अनुदानाचे धोरण स्विकारले गेले आहे. राज्यात नवीन तालुक्यांच्या संख्येत वाढ झाली असल्यामुळे ज्या तालुक्यात एकही अनुदानित महाविद्यालय अथवा विद्याशाखा नाही, अशा तालुक्यांमध्ये अनुदानित तत्वावर मंजुरी देण्याची मागणी पुढे आली होती. या मागणीच्या अनुषंगाने प्रत्येक तालुक्यात एक महाविद्यायास/विद्याशाखेस १००% अनुदान तत्वावर मंजूरी देण्याचा दिनांक ०४ फेब्रुवारी २००८ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता घेण्यात आली आहे. उपरोक्त शासन निर्णयाच्या अनुषंगाने मंत्रीमंडळाने दिनांक २८.४.२०२२ रोजीच्या इतिवृत्तामध्ये दिलेल्या मान्यतेनुसार विद्यमान विद्याशांखाना १००% अनुदानवर घेण्यात घेण्याबाबत शासन निर्णय दिनांक २६ मे, २०२२ अन्वये १००% अनुदान मंजूरी देण्यात आलेली आहे.

उक्त शासन निर्णयान्वये आदिवासी प्रगती मंडळ, संचलित, कॉम्रेड गोदावरी शामराव परुळेकर कला, वाणिज्य आणि विज्ञान महाविद्यालय, तलासरी, जि. पालघर या महाविद्यालयाच्या विज्ञान शाखेस तालुका एकमेव योजनेंतर्गत १०० टक्के अनुदान प्राप्त झाले, शासन निर्णय दिनांक ०२ जून, २०२३ अन्वये सदर महाविद्यालयाची शिक्षक व शिक्षकेत्तर पदांच्या वेतन खर्चाचा बांधिलकी खर्चाखाली समावेश करण्यात आला आहे. त्यामुळे सन २०२१-२२ या शैक्षणिक वर्षामध्ये प्रवेशीत विद्यार्थी संख्या विचारात घेवून दिनांक ०१.१०.२०२१ च्या विद्यार्थी संख्येच्या आधारे विज्ञान शाखेतील अनुज्ञेय करण्यात आलेल्या शिक्षकीय व शिक्षकेत्तर पदांच्या पदभरतीस मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील तालुका एकमेव योजनेंतर्गत १००% अनुदान प्राप्त आदिवासी प्रगती मंडळ, संचलित, कॉम्रेड गोदावरी शामराव परुळेकर कला, वाणिज्य आणि विज्ञान महाविद्यालय, तलासरी, जि. पालघर या महाविद्यालयास वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन सहायक प्राध्यापक या संवर्गातील १७ पदे व शिक्षकेत्तर संवर्गातील ०२ रिक्त पदे भरण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. पदभरतीस मान्यता देण्यात येत असलेल्या सहायक प्राध्यापक व शिक्षकेत्तर संवर्गाच्या पदांचा तपशिल कार्यभारानुसार खालीलप्रमाणे आहे:-

**संवर्ग:- सहायक प्राध्यापक**

| अ.क्र. | विषय | अनुज्ञेय पदे | भरलेली पदे | रिक्त पदे |
|---|---|---|---|---|
| १. | रसायनशास्त्र | ०६ | ०० | ०६ |
| २. | पदार्थ विज्ञान शास्त्र | ०२ | ०० | ०२ |
| ३. | वनस्पतीशास्त्र | ०४ | ०० | ०४ |
| ३. | प्राणीशास्त्र | ०२ | ०० | ०२ |
| ४. | गणित | ०३ | ०० | ०३ |
| **एकुण** | | **१७** | **००** | **१७** |

**संवर्ग:- शिक्षकेत्तर पदे**

| अ.क्र. | विषय | अनुज्ञेय पदे | भरलेली पदे | रिक्त पदे |
|---|---|---|---|---|
| १. | प्रयोगशाळा परिचर | ०७ | ०५ | ०२ |
| **एकुण** | | **०७** | **०५** | **०२** |

३. सहायक संचालक, मागासवर्ग कक्ष, कोकण विभाग, कोकण भवन यांनी दिनांक ११.३.२०२४ अन्वये सहायक प्राध्यापक संवर्गाच्या व दिनांक २७.६.२०२२ अन्वये बिंदुनामावलीस मान्यता दिल्यानुसार शिक्षकेत्तर संवर्गाच्या १७ सहायक प्राध्यापक पदे व शिक्षकेत्तर ०२ पदांचे आरक्षण खाली नमुद केल्याप्रमाणे राहील.

**संगर्व :- सहायक प्राध्यापक**

| अ.क्र. | तपशील | अ.जा १३% | अ.ज. ७% | विजाअ ३% | भजब २.५% | भजक ३.५% | भजड २% | विमाप्र २% | इमाव १९% | खुला ३८%+ ईडब्ल्यूएस १०% | एकुण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | मंजूर पदे | ०३ | ०२ | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०० | ०५ | ११ | २५ |
| २. | भरलेली पदे | ०० | ०० | ०० | ०० | ०० | ०० | ०० | ०० | ०६ | ०६ |
| ३. | दि. २६.२.२०२४ अखेर रिक्त पदे | ०३ | ०२ | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०० | ०५ | ०५ | १९ |
| ३. | एकूण भरावयाची पदे | ०३ | ०२ | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०० | ०५ | ०५ | १९ |

**उक्त मंजूर बिंदूनामावलीनुसार भरती वर्षात भरावयाच्या पदांचा आरक्षण तपशिल**

| अ.क्र. | तपशील | अ.जा | अ.ज. | विजाअ | भजब | भजक | भजड | विमाप्र | इमाव | एसईबीसी | ईडब्ल्यू एस | खुला | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | भरावयाची पदे | ०३ | ०२ | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०० | ०५ | ०२ | ०१ | ०२ | १९ |
| २. | रिक्त पदांपैकी प्रत्यक्ष भरावयाची पदे | ०२ | ०२ | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०० | ०५ | ०२ | ०१ | ०१ | १७ |

**संवर्ग :- शिक्षकेत्तर**

| अ.क्र. | तपशील | अ.जा १३% | अ.ज. ७% | विजाअ ३% | भजब २.५% | भजक ३.५% | भजड २% | विमाप्र २% | इमाव १९% | खुला ३८%+ ईडब्ल्यूएस १०% | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | मंजूर पदे | ०१ | ०१ | ०१ | ०० | ०० | ०० | ०० | ०१ | ०३ | ०७ |
| २. | भरलेली पदे | ०० | ०१ | ०० | ०० | ०० | ०१ | ०० | ०० | ०३ | ०५ |
| ३. | एकूण भरावयाची पदे | ०१ | ०० | ०० | ०० | ०० | -०१ | ०० | ०१ | ०० | ०२ |

**उक्त मंजूर बिंदूनामावलीनुसार भरती वर्षात भरावयाच्या पदांचा आरक्षण तपशिल**

| अ.क्र. | तपशील | अ.जा | अ.ज. | विजाअ | भजब | भजक | भजड | विमाप्र | इमाव | ईडब्ल्यूएस | खुला | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | रिक्त पदांपैकी प्रत्यक्ष भरावयाची पदे | ०१ | ०० | ०० | ०० | ०० | ०० | ०० | ०१ | ०० | ०० | ०२ |

६. उपरोक्त नुसार मान्यता देण्यता आल्याप्रमाणे सहायक प्राध्यापक संवर्गा व शिक्षकेत्तर संवर्गातील पदांची भरती प्रक्रीया राबविताना विद्यापीठ अनुदान आयोग व विद्यापीठ कायद्यातील प्रचलित कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा. सदरची पदभरती ही खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून असेलः-

१. शिक्षकीय व शिक्षकेत्तर संवर्गातील रिक्त पदावरच पदभरती करण्याची खातरजमा विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, कोकण विभाग, पनवेल यांनी करावी. सदरहू नियुक्त्यांमध्ये कोणत्याही प्रकारची अनियमितता झाल्यास, संबंधीत विभागीय सहसंचालक, कोकण विभाग, पनवेल हे सर्वस्वी जबाबदार राहतील.
२. शिक्षकीय व शिक्षकेत्तर या संवर्गातील पदभरतीसाठी मागासवर्गीय कक्षाकडून आरक्षण निश्चित करुन घेतलेल्या पदांची बिंदुनामावलीनुसारच पदे भरण्यात यावीत. प्रवर्गनिहाय सामाजिक आरक्षण,

सामाजिक आरक्षणाव्यतिरिक्त आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटक आरक्षण व समांतर आरक्षण (महिला, खेळाडू, अपंग इ.) तपासूनच पदभरती करण्यात यावी. अनुशेषाची पदे प्राधान्याने भरण्यात यावीत.

३. शिक्षकीय व शिक्षकेत्तर या संवर्गातील पदभरतीसाठी महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील विहीत तरतदींनुसार भरती प्रक्रीयेमध्ये शासन व विद्यापीठ प्रतिनिधी उपस्थित नसल्यास, सदरची भरती प्रक्रीया अवैध समजण्यात यावी. तथापि, सदरच्या विहीत प्रक्रीयेस बगल देऊन संस्थेने/महाविद्यालयाने नियुक्ती आदेश दिल्यास आणि त्यास संबंधित विभागीय सहसंचालक/विद्यापीठ यांनी मान्यता दिल्यास, संबंधीत विभागीय सहसंचालक, कोकण विभाग, पनवेल हे सर्वस्वी जबाबदार राहतील.

४. शिक्षकीय व शिक्षकेत्तर पदे भरतांना उच्च व तंत्रशिक्षण विभागाचा ७ व्या वेतन आयोगाचा शासन निर्णय क्रमांक Misc-२०१८/CR-५६/१८/UNI-१, दिनांक ०८.३.२०१९ तसेच शुद्धीपत्रक क्रमांक Misc-२०१८/CR-५६/१८/UNI-१, दिनांक १०.५.२०१९ मधील विहीत तरतुदी तसेच त्यामध्ये वेळोवेळी करण्यात आलेल्या सुधारणा आणि शिक्षकेतर पदांच्यासंदर्भात शासनाच्या दिनांक २६.८.१९९९ मधील विहीत तरतुदी विचारात घेऊनच, पदांसाठी आवश्यक असलेली शैक्षणिक अर्हता/पात्रता तसेच महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ कायदा, २०१६ मधील विहीत तरतुदी आणि शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

५. सदर पदांची नियुक्ती करताना प्रचलित विद्यापीठ कायद्यानुसार शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या विहीत निवड समितीमार्फतच निवड करण्यात यावी. विहीत कार्यपद्धतीचा अवलंब न करता भरलेले पद रद्द करण्यात येईल व नियुक्तीच्या संदर्भात भविष्यात न्यायालयीन प्रकरण उद्भवल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी विभागीय सहसंचालक, कोकण विभाग, पनवेल यांची राहील.

६. शिक्षकीय व शिक्षकेत्तर संवर्गातील पदांच्या निवड प्रक्रियेसाठी प्रचलित नियमातील/ परिनियमातील तरतुदींचा विचार करुन उमेदवारांची पात्रता निश्चित करण्याची जबाबदारी संबंधित संस्थेची राहील. तसेच प्रचलित नियमास बगल देऊन नियुक्ती देण्यात आल्यास, संबंधित विभागीय सहसंचालक/विद्यापीठ/प्राचार्य/व्यवस्थापन हे सर्वस्वी जबाबदार राहतील.

७. शिक्षकीय व शिक्षकेत्तर या संवर्गातील पदावर कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांची प्रतिनियुक्तीने इतरत्र पदस्थापना करण्यात आली असल्यास, सदर रिक्त पदावर कोणत्याही परिस्थितीत नवीन नियुक्ती करण्यात येणार नाही. अशा प्रकारच्या पदांचा समावेश पदभरतीच्या प्रस्तावात करण्यात आल्यास, त्याची सर्वस्वी जबाबदारी ही प्राचार्य व संस्थेची राहील.

८. शिक्षकीय व शिक्षकेत्तर संवर्गातील पदावर कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्याने धारणाधिकार ठेवला असल्यास, सदर रिक्त पदावर कोणत्याही परिस्थितीत धारणाधिकार संपुष्टात येईपर्यंत नवीन नियुक्ती करण्यात येणार नाही आणि अशा प्रकारच्या नियुक्त्या केल्यास प्राचार्य व संस्था सर्वस्वी जबाबदार राहील.

९. शिक्षकीय व शिक्षकेत्तर संवर्गातील पदे भरताना महाराष्ट्र शासनाने वेळोवेळी निर्धारित केलेल्या अर्हता, अनुभव, व्यावसायिक पात्रता यांचे तंतोतंत पालन करून, सदरची पदभरती करण्यात यावी. याबाबतीत अनियमितता झाल्यास त्याला सर्वस्वी संबंधित विभागीय सहसंचालक/ विद्यापीठ/प्राचार्य/ संस्थेचे व्यवस्थापन जबाबदार राहतील.

१०. अनुज्ञेय शिक्षकीय व शिक्षकेत्तर संवर्गातील पदे निश्चित करण्यासाठी मंजूर तुकडी, तुकडीची विद्यार्थी क्षमता व आवश्यक ते सर्व निकष व नियमांचे अनुपालन करुन पदे अनुज्ञेय केल्याबाबतची खातरजमा करण्याची जबाबदारी विभागीय सहसंचालक, कोकण विभाग, पनवेल यांची राहील.

११. शिक्षकीय व शिक्षकेत्तर या संवर्गातील अतिरिक्त पदांचे समायोजन केले असल्याची पुन:श्च खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, कोकण विभाग, पनवेल यांची राहील.

१२. मान्याताप्राप्त रिक्त पदे भरण्याची कार्यवाही सदर मान्यतेच्या/नाहरकत प्रमाणपत्राच्या दिनांकापासून सहा महिन्यांच्या आत पूर्ण करण्यात यावी. सहा महिन्यांनंतर सदरचे ना-हरकत प्रमाणपत्र आपोआप रद्द समजण्यात येईल.

२. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ अनौसं १५/आपुक/२३, दिनांक २३.१.२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले. त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०३१५१४५८५४०४०८ असा आहे. सदरहू शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

ASHOK S MANDE

Digitally signed by ASHOK S MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK S MANDE
Date: 2024.03.15 15:08:26 +05'30'

**( अशोक शं. मांडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६. कुलगुरु, मुंबई विद्यापीठ, मुंबई
७. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, कोकण विभाग, पनवेल.
९. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर.
११. अध्यक्ष/सचिव, आदिवासी प्रगती मंडळ, संचलित, कॉम्रेड गोदावरी शामराव परुळेकर कला, वाणिज्य आणि विज्ञान महाविद्यालय, तलासरी, जि. पालघर
१२. निवडनस्ती/म.शि.५ कार्यासन.